होऊन भाषण करीत होते ते निरूपण लाविलें. हजारों मनुष्यें कीर्तनास बसलीं होतीं त्यांचें नेत्रास अश्रुपात होऊन कोणास देहभान राहिलें नाहीं. मग अनंतदेव यांनीं स्वामींकडे जातांना पाहिलें तों चतुर्भुज पीतांबरधारी मूर्ति स्वामींचे खांद्यावर दिसूं लागली. नंतर अनंतदेव यांनीं मनांत विचार केला कीं, हें कांहीं मूल नाहीं प्रत्यक्ष श्रीहरीचें स्वरूप आहे. असें म्हणून जयरामस्वामींपाशीं येऊन साष्टांग नमस्कार घालून विनंति केली कीं मजकडून मोठा अपराध झाला तो आपण क्षमा करावा. असें बोलून स्वामींस म्हणूं लागले कीं, आजपर्यंत आम्हीं जन्मकाळ केला. आज प्रत्यक्ष श्रीकृष्णजन्म झाला. असें म्हणून नेत्रांस अश्रुपात येऊन सद्गदित होऊन जयरायस्वामींस म्हणूं लागले कीं, तुमचे खांद्यावर मुरलीधराची मूर्ति दिसत आहे ती खालीं ठेवून कीर्तन करावें. मग स्वामी बोलले कीं, मूल खालीं उतरावयाचें नाहीं. असें म्हणून अनंतदेव यांस समोर बसवून जन्मकाळ करून श्रीकृष्णाची मूर्ति अनंतदेव यांचे ओट्यांत घालून एकमेकांस नमस्कार करून खालीं बसले. मग अनंतदेव यांनीं जयरामस्वामींस सांगितलें कीं, हा जन्माष्टमीचा उत्साह तुम्हीं आजपासून करीत जावा. त्या वेळेपासून परंपरेनें चालत आहे. असा चमत्कार ते समयीं झाला. तो सर्वत्रांनीं पाहिला.

नंतर जयरामस्वामी काशीमध्यें कांहीं दिवस राहून तीर्थयात्रा करीत करीत वडगांवास आले. जयरामस्वामी यांचा नित्य नेम असा होता कीं दररोज सद्गुरुनाथ यांची कांकडआरती प्रातःकाळीं करून नंतर स्नान करून नित्यनेम सारून स्वामींची षोडशोपचारें पूजा करून, धूप दीप नैवेद्य दाखवून, बारा घटका दिवस येई तों पर्यंत स्वामींचे चरणारविंदीं लक्ष ठेवून भजन करीत असावें व तेव्हां स्वामींची मुरलीधराची मूर्ति पूजा करावयाची होती त्या मूर्तीनें नृत्य करीत असावें.

असा क्रम चालत असतां एके दिवशीं श्रीशंकराचार्यांची स्वारी वडगांवचे कुसवाजवळ आली आणि मंडळीस विचारलें कीं या गावांत ब्राह्मणांचीं घरें किती आहेत तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं एक ग्रामजोशी यांचें घर आणि एक सत्पुरुषाचा मठ आहे असें सांगितलें. नंतर आपले शिष्यांस त्यांनीं सांगितलें कीं मजपर्यंत त्यांस घेऊन यावें. नंतर शंकराचार्य यांचे आज्ञे प्रमाणें शिष्यांनीं येऊन शोध केला कीं जयरामबावा साधु कोठें आहेत. गांवांतील मंडळींनीं सांगितलें कीं आपले गुरूचे समाधीपाशीं भजन करीत आहेत. मग त्या समाधीपाशीं येऊन पोहोंचले तों भजनाचा समारंभ मोठा चालला आहे आणि आपलेकडे कोणी पाहात नाहीं. असें पाहून

तेथें क्षणभर उभे राहून आपले स्वामींपाशीं येऊन त्यांनीं सांगितलें कीं ते कांहीं न बोलतां भजन करीत आहेत. मग शंकराचार्य स्वामी यांनीं आपले शिष्य चार असामी बोलावून त्यांस सांगितलें कीं आपण जयराम यास जाऊन सांगावें कीं आपले गांवापाशा शंकराचार्य आले आहेत ते जगद्-गुरु व तुमचे गुरु आहेत. त्यांचा सत्कार न करितां उगीच ढोंग माजवून समाधीपुढें कीर्तन करितां, तुम्हांस कांहीं समजत नाहीं, तर आपण येऊन आचार्य यांची पूजा करावी नाहीं तर तुम्हांस दंड पडेल. असें जाऊन जयराम गोसावी यांस सांगणें. मग ते शिष्य चार असामी समाधीपाशीं आले तों कीर्तन होऊन सद्गुरुनाथ यांची आरती होऊन जयरामस्वामी बसले आहेत. शंकराचार्य यांचे ब्राह्मण येऊन पोहोंचले तेव्हां जयरामस्वामी यांनीं त्यांस पाहून यांचे पायांवर मस्तक ठेविलें आणि आपले जवळ बसविलें आणि त्यांस विचारिलें कीं आपण कोठील ! कोण ! ते म्हणाले कीं श्रीशंकराचार्य येथें आले आहेत ते जगद्गुरु व तुमचे ही गुरु आहेत. त्यांचा सत्कार न करितां उगीच ढोंग माजवन समाधीपुढें कीर्तन करितां असें म्हणून जयरामस्वामींचे गुरूची व त्यांची त्यांनीं निंदा केली. तें स्वामींनीं ऐकून ब्राह्मणांस म्हणूं लागले कीं शंकराचार्यांचें आम्हीं काय घेतलें आहे ? आह्मावर दंड कशाबद्दल बसवितात हें कारण आम्हांस सांगावें. मग ते ब्राह्मण स्वामींस म्हणूं लागले कीं आमचे शंकराचार्य यांचें शिखासूत्र व यज्ञोपवीत तुमचे जवळ आहे तें द्यावें म्हणजे आम्हीं जातों. मग स्वामींनीं आपले गळ्यांतील यज्ञोपवीत व शिखा उपटून त्यांच्या पुढें ठेविली आणि आपले गुरूची निंदा केली म्हणून त्यांजबरोबर अगदींच कांहीं पुनः भाषण केलें नाहीं. मग ते चौवे ब्राह्मण यांनीं तें यज्ञोपवीत व शिखा घेऊन श्रीशंकराचार्य यांजपाशीं येऊन तेथील सर्व वर्तमान निवेदन केलें. मग श्रीशंकराचार्य कांहीं एक विचार न करितां संपूर्ण मंडळींसह नदीवर स्नानास उतरले. सर्वत्र मंडळी स्नानास जातांना एकमेकांस म्हणूं लागले कीं जयराम गोसावी हा भ्रष्ट झाला. त्यास कोणीं पंक्तीस घेऊं नये. अशीं पत्रें चोहोंकडे पाठवावीं. असें म्हणत म्हणत कृष्णास्नान करून वरती निघून शेंडी झाडावयास लागले तों सर्वत्रांस शेंड्या नाहींत व यज्ञोपवीतेंही गळ्यांत नाहींत असें झालें तेव्हां ते एकमेकांकडे पाहूं लागले. तों सर्व संन्याशा सारखे दिसूं लागले आणि म्हणूं लागले कीं यज्ञोपवीतें दुसरीं मिळतील परंतु शेंडी दुसरी कोठून आणावी. असा विचार करून श्रीशंकराचार्य यांजपाशीं येऊन सर्व मजकूर झाला तो निवेदन केला व हात जोडून उभे राहिले तेव्हां शंकराचार्य म्हणूं लागले कीं एकाएकीं च सर्वांच्या शिखा व यज्ञोपवितें

कशानें गेलीं. मोठें आश्चर्य झालें. असें म्हणून मनामध्यें विचार करून [ जयरामस्वामींचे ] गुरूचें ध्यान करून गुरूस वर्तमान सांगितलें तेव्हां त्यांचे गुरु [ शंकराचार्यांचे ] समाधींत येऊन सांगूं लागले कीं जयराम गोसावी वडगांवकर यांचा व त्यांचे गुरूचा छळ केला म्हणून तुमच्या सर्वत्र मंडळीची अशी दशा झाली. परंतु वडगांवास परत जाऊन त्यांचे चरणावर मस्तक ठेवून त्यांस नानाप्रकारें विनवून त्यांचे मस्तकावर शिखेचा मंत्र स्थापून यज्ञोपवीत आपले हातून त्यांचे गळ्यांत घालावें. मग जयरामस्वामी तुह्मांस सांगतील तसें तुम्हीं करावें. हें तुम्हीं कराल तर तुमचे मंडळीस शेंड्या व जानवीं मिळतील. असें शंकराचार्य यांचे समाधींत सांगून आपण अंतर्धान पावले. मग आचार्य नेत्र उघडून सर्वत्र मंडळीस म्हणूं लागले कीं आज तुमच्या हातून अपराध मोठा झाला. आतां तुम्हीं आम्हीं वडगांवास माघारे जाऊं चला. असें म्हणून सर्वत्र मंडळी बरोबर घेऊन वडगांवास आले आणि जयरामस्वामींस साष्टांग नमस्कार घालून बळकट पाय धरिले. हें स्वामींनीं पाहून आपण शंकराचार्य यांचे पायांवर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार घालून जगद्गुरु शंकराचार्य यांस म्हणूं लागले कीं तुमचा सर्वस्वी मी अपराधी आणि तुमची पदवी मोठी असतां मजला नमस्कार करितां ही गोष्ट चांगली नाहीं. नमस्कार करण्याचें कारण काय हें मजला सविस्तर कळवावें. मग आचार्य यांनीं सांगितलें कीं आम्हीं आपले येथें येऊन श्रीकृष्णाप्पास्वामी तुमचे गुरु यांचा व तुमचा छळ केला त्या योगानें शेंड्या व जानवीं नाहींशीं झालीं म्हणून आम्हीं सर्व मिळून आपलेपाशीं आलों. असें सांगून शिखेचा मंत्र व यज्ञोपविताचा मंत्र म्हणून श्रीशंकराचार्यांनीं आपले हातानें यज्ञोपवीत स्वामींचे गळ्यांत घातलें. मग स्वामींनीं सर्व ब्राह्मणमंडळी पाहून त्यांस सांगितलें कीं तुम्हीं आमच्या गुरूची निंदा केली त्याजमुळें तुम्हीं सर्व मंडळींनीं गुरूच्या चरणाचें पावन तीर्थ आहे त्यामध्यें स्नान करून यावें म्हणजे गुरुनिंदेपासून मुक्त व्हाल आणि तुमचे तुम्हांस जिन्नस मिळतील. मग सर्वत्रांनीं पावन तीर्थांत जाऊन स्नान केलें आणि बाहेर निघाले तों ज्यांच्या त्यांस शेंड्या व यज्ञोपवीतें प्राप्त झालीं हें सर्वत्र ब्राह्मण मंडळींनीं पाहून जयरामस्वामींस साष्टांग नमस्कार घालून श्रीकृष्णाप्पास्वामी यांचे समाधीस नमस्कार करून म्हणूं लागले कीं जयरामस्वामी हे ईश्वराचे अवतार आहेत. मग शंकराचार्य यांस जयरामस्वामींनीं चार दिवस ठेवून घेतलें. दररोज भोजन झाल्यावर स्वामींनीं कीर्तन करावें. तें आचार्य यांनीं व सर्वत्र मंडळींनीं ऐकून फार आनंद होत असावा. अपरोक्ष अनुभवाचा ग्रंथ स्वामींनीं केला त्याजवर आचार्य यांनीं टीका केली,

सुगंध सुमनें जाई जुई मोगरा चंपक मालती बकुली शेवती व सुवर्णकेतकी गुलाब विश्रांतिदायक व चतुर सेवक ठायीं ठायीं उभे केले. सभासदनीं हमजात मराठे घरंदाज बांके पोशाख भरजरी बादली लाल कुसुंबी हरित् पीत केशरी व जांबळी व शाला उंची व कळस्पाकी बुट्टेदार व सफेत एकापरीस एक बावरें समशेरबहादर मस्तकीं कलगी जडावाचे शिरपेंच कंठाभरण पदकें मोहनमाळा कंठे कंठया मोत्यांच्या लोलकांसहित, कर्णमात्रा हुरमुजी मुक्ताफळें वेष्टित, हातीं सुवर्णाचीं कडीं व आंगोठिया रत्नांकित, अंगीं जिरे बख्तरें चिलखतें, मस्तकीं टोप, सन्मुखीं बिन्या तोंडे नेरेवरी पृष्ठीं भाळाचे घोष हंसवस्त्राचे अभिनव निर्मून जननयनास विचित्रता दाखविली. तैसेच हिरवे वसनाचे शुकास्त्रांच्या कोकिला चतुरें करून लाविल्या, तेणेकरून दैदीप्यता महाराजांस व अफजलखानास व नबाब नसरतजंग यांस सात फावतीनें बैठका निरनिराळ्या सन्मुख घातल्या त्या भरजरी. वरते पोस. खानाचे लोडांत चर्ममंडित चमत्कारास्तव चिमण्या गुप्तरूपें अद्भुत घातल्या. त्यांस अंगसंगाचा स्पर्श होतांच शब्दें विश्रांति व्हावी. याप्रमाणें मांडणी केली. ठायीं ठायीं तरू काश्मीर कांचेचे अति रमणीक पंचरंगी भिन्नाभिन्न फळें सुमनें संयुक्त व पंचरंगी कागदी वृक्ष चंपक बकुली आम्र जंबु फलादि प्रत्यक्ष गोचर होतांच अपेक्षित जन यांस संतोष पावे. तसेंच हस्तकारंजें ठायीं ठायीं उदकवृष्टितुषारें ग्रीष्मता हरण करीत आहे. जनमानससंतुष्टतेस तोय व अमोघ सेवनास सुगंधित अष्टगंध व अगरबत्त्यांचे तरू ठायीं ठायीं प्रदीप्त करून तबकें ठेविलीं. मोमबत्त्या सुरूदार अचल तबकें ठेवून प्रदीप्त. ढाला, दस्तकें, बेरे, रूमी, जनबी, फिरंगी, तोमर, सईफ, गुर्दे, दुमदुमे, गुरूज हीं शस्त्रें परम दारुण वैरियांसि अंतकासमान, ज्यास शस्त्रघाताचा स्पर्श होतांच मृत्युदायक. असे शंभर वीर सभाभुवनीं आरूढले. खंजीर ढाला बिचवे जमदाडा वीरांचे हातीं व कटीस व करपल्लवीं वाघनखें मुष्टिभागीं गौप्यरूपें. याप्रमाणें खासे सदरेचा बंदोबस्त केला.

या विरहित बाकीचे सहा सदरांचा बंदोबस्त करून बारगीर शिलेदार सलाहपोष मर्दानें हाटेले नामांकित दर सदरेस एकेक हजार ठेविले. ते वस्त्राभरणें सालंकृत विराजले. मत्त कुंजराची ज्यांस पर्वा नाहीं, सदट उन्मत्त

---

५९. नरवरी=नरवर येथें होणारे. लोखंडी व पोलादी कामाकरितां नरवर प्रसिद्ध आहे.

६०. दस्तकें बेरे रुमी जनबी फिरंगी. — दस्तकें बेरे=ढाला. रुमी=रोम येथील. जनबी=दक्षिण देशचीं. फिरंगी=युरोपांतील.

भयानक, बडे जंगलके रहनेवाले बावरे वाघासारखे, युद्धकंदनास परम सादर, ज्यांस अनादर नाहीं, जीवित्व म्हणजे तृणप्राय. याप्रमाणें महाराजांनीं बंदोबस्त करून खानाचे प्रत्ययास येण्याकरितां दत्ताजीपंताचे विद्यमानें जो करार त्यांस अंतर न पडावयाकरितां सदरे पाठीशीं पडदे बांधून गुप्तरूपें ठायीं ठायीं सरंजाम खानाचे दृष्टीस न पडे अशा तजविजीनें ठेवून बंदोबस्त केला. तसेंच घाटमेटींचे दऱ्यांतून मावळे लोक ठेवून नेताजी पालकर फौजेनिशीं सावधतेनें इशारतीस्तव घांटावरि ठेविले. मोरोपंत पेशवे यांस महाराजांनीं कोकणांतून सडे फौजेनिशीं टाकोटाक आणविलें. आणि सर्वांस तोफेचे इशारतीची आज्ञा केली. आणि उदईक खानाची भेटी निश्चयपूर्वक होणार हा सिद्धांत जाहला आहे, तुम्हीं सर्वांनीं इशारतीबराबर घाटाखालीं उतरून खानाचे रावरि चालून येऊन मारामारी करून युक्ती प्रयुक्तीनें युद्ध करणें, लुटीवर नजर न देतां बहुत सावधपणें खानाचें लष्कर हस्तगत करणें सांगितलें. याप्रमाणें सांगोन पाठवून खुद्द महाराजांनीं भारी अवसाने श्रीअंबेचें स्मरण केलें. तेचसमयीं श्रीनें महाराजांचेअंगीं प्रसन्न होऊन संचार करून बोलों लागली जे, "शिवाजी तूं कांहीं चिंता न करणें. यासमयीं मी खुद्द तुझे पृष्ठीवरि उभी आहें. खानास मोह घालून तुझे सन्मुख म्हैसा आणितें. तरि तूं निर्भय चित्तें अवसान धरून अफजलखान याचा वध करणें, आणि तत्क्षणीं शीर कापून माझे पुढें ठेवणें. आणि त्याचे रुधिराचा टिकला शौर्यत्वाचे भूषणास. ललाटीं लावून म्हैसा दाणीस देऊन मज संतुष्ट करणें." अशा प्रकारें वदोन श्री तुळजा भवानी अदृश्य जहाली. महाराजांस सावध होतांच सन्निध असणारे प्रभाकरभटजी उपाध्येबावा व गंगो मंगाजी वाकनीस व संभाजी कावजी महालदार, गोमाजी नाईक संकपाळे जामदार व कृष्णाजी गणेश प्रभु जामदारखानेकडील कारकून व गोविंद रुक्मांगद प्रभु पोतनीस व दादाजी रामाजी प्रभु जिरादखानेचे कारकून व काकाजी लक्ष्मण प्रभु वाढते मुलांचे सबनीस, बाळाजी आवजी प्रभु चिटणीस व कृष्णाजी नाईक व सुभानजी नाईक वगैरे मातबर होते त्यांणीं श्रीचीं आज्ञावचनें, "महाराजांनीं चिंता न करावी, अफजल मारून जय संपादितलि, खान म्हैसा मोह घालून पुढें उभा करितां त्यास न भितां शस्त्र करून वधून त्याचे शोणिताचा टिळा लावून शिर कापून आपले पुढें ठेवणें, तुझे पाठीवर स्वतां सिद्ध आहें, हें अभय असे," म्हणोन बोलली असें सांगितलें. तें श्रवण करून परम संतोष जहाला. तेचक्षणीं वाकनिसास ज्ञाला करीणा लिहून ठेवणेस सांगोन किल्यास लिहिला.

६१. घाटमेट=घांटामधील मोडी, खोरीं. | ६२. "पानसंबळ" असें अन्यत्र आहे.

तदुत्तर भारी तरतूद कांहीं वसवसा न धरितां केली. हेजीब यांणीं सांगितलेप्रमाणें निर्भय चित्तें रडतोंडीचा घांट उतरून तयारीचे फौजेनिशीं जल्दीनें सिद्ध होऊन महाराजांचे भेटीस खान चालले. समागमें निवडक स्वार पठाण मोंगल रोहिले धनगर मराठे हाटेले बिर्दाईत दोन हजार व पायचे लोक बंदुख बरखंदाज दोन हजार मुस्तेद असलेले विलोकून दत्ताजीपंत यांणीं खानास अर्ज केला जे, "इतके संगीन तयारीनिशीं गेलियानें महाराज भयाभीत होऊन माघारे जातील. सर्वथा भेटी होणार नाहीं. आपण पादशाही वजीर नामांकित धुरीण असतां राजे म्हणजे काय तृणवत्!! त्यांस इतके सामान किमर्थ! ते कराराप्रमाणें दोन माणसांनिशीं येणार. आपणही तसेंच जाऊन भेटून बैसले नंतर पुढें तजवीज करणें ती करावी." ऐसें स्पष्ट बहुता रीति सांगितलेवरि जमाव आणिलेला बाणाचे टप्पेवरि दूर उभा करवून खान पालखींत करी सह पुढें चालिले. एक सैद मोठा शूर व दत्ताजीपंत बरोबर अरेस जाऊन बैसले. आणि खान चित्तांत परम संतप्त होत्साता मदापानें भ्रम पाहोन कैफी होऊन पिशाचवृत्तीनें नानाप्रकारें वल्गना करून बोलि- "शिवाजी राजा म्हणजे काय! शहाजी राजाचे बेटे. वजीर त्यास ाधन संपदा एवढी पादशाहास नाहीं. राजियाची सदर पाहतां अमर- ातुल्य देखकर अक्कलमंद बेहोष हुवा. हमारे पादशाहा कू ऐशी सदर भरजरी कपडे और मोतीलग असमानगिऱ्या भरबिछाईत पाहून, चकित होऊन, परम क्रोधित होऊन, दत्ताजीपंतास बोलावून, शिवा तूं शिदाबीनें भेटीस आणवणें, असें सांगितलें.

ते समयीं पंतानीं महाराजांस खान येऊन पूर्वींच बसले आहेत, त्वरा करितात, यास्तव स्वारी विलंब न करितां यावी म्हणोन हरकारे ताबडतोब महाराजांकडे पाठविले. त्याणीं जाऊन मुजरे करून दत्ताजीपंतानीं सांगितले प्रकारें महाराजांस मजकूर श्रुत केला. महाराजांनीं त्यांचा बहुमान करून वस्त्रें व सोनियाचीं कडीं बक्षीस दिधलीं. आणि ममता दाखवून घरोबियाचे संबंधानें विचारिलें जे, खानाचे समागमें स्वार शिबंदी किती आहे? याजवरून जासूद हरकारे यांणीं विनंति केली जे, "प्रथम अफजलखान गोटांतोन भेटीस निघाले तेसमयीं मोठे कराराचे धारकरी शिपायी पठाण मोंगल व रोहिले उजबेक मराठे व धनगर व रजपूत रांगडे मिळोन दोन हजार स्वार व पायचे लोक बरकंदाज तोमर इटे पट्टे समशेर बंदुखबारदार मिळोन दोन अडीच हजार याप्रमाणें सामान संगिनात घेऊन येत असतां दत्ताजीपंत यांणीं अफजलखानास अर्ज केला जे, इतके फौजेचें कारण नाहीं. भारी फौज पाहिली असतां

राजे सहसा भेटीस येणार नाहींत. आम्ही असा करार केला आहे सडे निशीं उभयतांनीं भेटावें, त्या करारास अंतर पडतो, ही अनुचित गोष्ट, त्याजवरून सारी फौज बाणाचे टप्पेवरि ठेवून एक मोठा धारकरी अंगाजणाचा[६३], सारे शाहींत अस्कारियाचा[६४], मात्र बलकुबलीस समागमें आहे. त्याचे भरंशेवरि बेफिकीर आला आहे." हें ऐकून घेऊन त्यांस आज्ञा केली कीं, "आम्हीं सिद्ध होऊन सत्वरच येतों, यदर्थीं विलंब नाहीं, म्हणोन अफजलखानास व दत्ताजीपंतास इकडील निरोप सांगणें. असें सांगतांच जासूद व हरकारे निघाले, इतकियांत पुन्हा महाराजांस स्मरण झालें जे, दत्ताजीपंत यांस गुप्त निरोप सांगणें राहिला. त्याजवरून जासूद हरकारे यांस परत आणवून सांगितलें जे, सैद बडा बरजोर[६५] याजकरितां भय उत्पन्न होऊन शंका वाटते यास्तव त्यास दूर ठेवणें, त्यांणीं जवळ असणेचें कारण नाहीं, जर त्यास खान जवळ ठेवतील तरि भेटीस येणें होत नाहीं. असें सांगोन केलें, त्यांणीं जलदीनें जाऊन खानाजवळ सांगितलें जे महाराजांस यावयाची त्वरा जाहली आहे परंतु एका गोष्टीची शंका महाराजांस प्राप्त ली आहे याजमुळें अवकाश आहे. हें सविस्तर दत्ताजीपंत यांस सांगो जकडून तपशीलवार हकीगत खानास जाहीर केली, त्याजवरून ख सैद बडा यास दूर ठेविला आणि पुनरपि दुसरा निरोप महाराजांनीं जासूद कारे यांजसमागमें गुप्त सांगोन पाठविला होता तो असा कीं, खानास सदरा दाखवून सातवे सदरेस बैठक केली तेथें नेऊन बसवावें. जास्ती माणसें नसावींत. आम्ही दोन माणसांनिशीं सात तासांचे अमलांत येतों, सैद बंडा सन्निध असों नये, म्हणोन तो दत्ताजीपंतानीं ऐकून घेऊन महाराजांस विनंति सांगोन पाठविली जे, सैद बडा याजला खानास कळवून दूर ठेविला. तदुत्तर अफजलखान यांस सर्व सदरांची हवा दाखवून तदनंतर सातवी सदर खाशी तेथें नेऊन बैठकीवर बसवितों. आतां हें वृत्त कळतांच महाराजांनीं मोठे हिमतीनें धैर्य धरून अणुमात्र असावध न राहतां शिलेपोषें[६६] सरंजामानिशीं महाराजांनीं अफजलखान यांचे भेटीस यावें. म्हणोन गुप्तपणें महाराजांस दत्ताजीपंत यांणीं ममताभाव संज्ञार्थ विनंति चिठ्ठी पाठविली.

तदुत्तर पंत यांणीं खानास अर्ज केला कीं, "महाराज सत्वरच सिद्ध होऊन सहावे तासाचे अमलास सुमुहूर्तें येत आहेत राजे यांसि आपले मुलाकतीचा

---

६३. अंगाजणाचा, अंगेजणीचा=आंगच्या हिमतीचा, हिंमतवाला.

६४. अस्कारियाचा. अस्करा=शौकिक, कीर्त.

६५. बरजोर=जोरदार, शक्तिमान्.

६६. शिलेपोष=कवच-युक्त, सन्नद्ध.

अतिशयेशीं आनंद प्राप्त झाला आहे. खान आम्हांस वडिलांतुल्य आणि पादशाहाचे हुजूर, जागजागा हरगीज आपलें उणें पडों देत नाहींत, इच्छिलें मनोभिष्ट सिद्धीस पाववितील असा निश्चय महाराजांचे चित्तापासून बेकिलाफ. सर्वोपरि आभार खानावर. सर्वांस कारण एक विश्वास खातरजमा करून खानास नजर केला आहे. खानाचे वचनाप्रमाणें वर्तणूक करून हजरत पादशाहाचे हुजूर खान आपली षबाहतेनिशीं सरफराजी करतील." अशा प्रकारें महाराजांकडील सविस्तर सांगितल्यानंतर खान परम समाधानातें पावते जहाले. तदनंतर दत्ताजीपंतांनीं पुन्हा अर्ज केला जे, राजे यांणीं आपला दील आराम व्हावयाकरितां सात सदरा तऱ्हेदार केल्या आहेत त्या आपण नेक नजरेनें अवलोकन कराव्या. असा महाराजांचे चित्तांतील हेतु. त्याजवरून खान खुष होऊन सहा सदरा पहावयास दत्ताजीपंतास समागमें घेऊन तत्क्षणीं उठोन साही सदरांचें कौशल्य कौतुक पाहून परम समाधान पावून उश्वास टाकून स्वमुखें पंतास बोलिला जे, शिवबा बहुत चतुर हिकमतीनें सदरा एकापरीस एक जादा निर्मिल्या आहेत. त्या पाहून मेरा दिल आराम पाया. सर्वांहून सातवी सदर, इंद्रभुवनातुल्य महातेजस्वी प्रभा [illegible]. सूर्य किरणें करून विलोकितां नेत्र [illegible] चलनें पवले. [illegible] नजर ठरेना. ऐशी सदर या [illegible] कलियुगीं. या पुढें पादशाही सदरा तुच्छ अ[illegible]मच. दुसरी समता यावयासि भूमंडळीं नाहीं. ती पाहून खानाची दृष्टि झांकळोन गेली. चाचरी जाऊं लागली. तेव्हां दत्ताजीपंतांनीं खानाचा हात धरून बैटकेवरी नेऊन बसविलें. आधींच कैफदार मद्य सेवून, तन्मुळें देहभाव विसरोन अज्ञानपणें अविचारें दत्ताजीपंताजवळ बोलों लागला, "शिवानें तरवारके जोरसे ज्यादा दौलत कमाई. सब् पादशाही मुलुख खराब करून गड कोट किल्ले जबरदस्तानें घेऊन पादशाहीकी खराबी केली. ऐशी सदरकी व [१७]लैं जाह अलम्पन्हा दिल्लीके पादशाह और बडे बडे हिंदू राजनकू और दख्खनके पादशाह हैदराबाद तानाशाह व बेदर व दौलताबाद व बिजापूरका अल्ली अदलशाह पादशाहकूभी नही. सदरेचे मांडणीची तारीफ अजब! सब् सुनेरी कपडे और मोतनके घोंस जडजडाव पाहून खान दंग जहाला. चित्रविचित्र फंदील ते बहुत, तारिफेचीं झाडें व हंस मयोर शुकपक्षी मैना व बदकें बाजबाहिरी सिंह व्याघ्र नानापरीचीं श्वापदें गेंडे, बहिरी, चित्ते, शाहगोज याप्रमाणें चित्रें पाहिलीं. व संपूर्ण देवसभा पन्नगसभा, गणगंधर्वसभा व दैत्यराक्षससभा व भूतळीं राजयांच्या सभा धर्मादि भोज-विक्रम-शालिवाहनसभा या चित्रेंकरून लिहिल्या. तदनंतर कलि-

१७. बेलेजाह=उच्चपद.

युगीं शाहाजीसुत शिवाजी महाराज यांची सभाही चतुरत्वें लिहिली. तेथें महाराजांचें विशाल स्वरूप परम कौशल्यतेचें लाघव केलें. खानाचें स्वरूप काढून महाराजांची व खानाची हातघाई युद्ध होऊन खानास मारून भूमीवर पाडिला हीं सन्मुख विलोकनास चित्रें रेखिलीं होतीं. त्यांजवरि खानाची दृष्टि पावतांच सरसरून एकाएकीं उठला. हें दत्ताजीपंतांनीं पाहून हातीं धरून बैठकीवर बैसविलें आणि बोलले आपण कोणते कार्यास आलां ! आणि असा विचार केलियानें पुढें कोणता विचार चित्तांत आणिला ? आतां सावध होऊन राजियाचा स्नेह संपादून योजिलें कार्य करणें." ऐसें सांगतांच खान उगेच राहिले.

महाराजांकडे सातवे सदरे अफजलखान येऊन बसल्याचें वर्तमान बातमीदारांकडून पोंचल्यानंतर स्नान करून नित्यकृत्य कर्माचरण संपादून, श्रीकुलदेवतेचें पूजन करून नैवेद्य अर्पून तीर्थप्रसाद सेविला. तदुत्तर श्रीमन्सकल सौभाग्यादि संपन्न मातुश्री जिजाऊ साहेब यांचे मंदिरीं आगमन करून चरणावरि मस्तक ठेवून, अफजलखान भेटीस जाणेचा वृत्तांत विदित करून, मातोश्रीसह सुवर्णताटीं पंचामृत भोज[illegible]न करून, नंतर षो[illegible] [illegible], राजमंदिरीं बसोन, रणकंदनाचीं तीव्र [illegible] [illegible] समान तेजस्वी, ज्यांचा वातस्पर्श होतांच पंचप्राणही प्रयाण करीत आहेत, अशीं प्रत्यक्ष विषधर तक्षकासमान घेतलीं. व तैशींच भरजरी दिव्यवस्त्रें व नवरत्नांकित भूषणें घेतलीं. यदर्थीं श्लोकः

जीरें टोप शिरीं कटीस बरवी पेटी जरी बांधली ।
आंगीं बख्तर घातलें वरि झगा वीचित्रता दाविली ॥
मुक्तांकीत तुरा सलंब कलगी वीराजिली मस्तकीं ।
भूमोल्या व तु ता जडीत खरगे आपूर्व जाणा निकी ॥ १ ॥
कर्णीं कुंडल झळकती किति तरी आमोल्य मुक्ताफळें ।
चंद्राहूनि सतेजताचि अगळी अन्यत्रता नातुळे ॥
कंठीं हेम जडीत [ दिव्य ] पदकें नाभिप्रभा दाविती ।
शीवाजी नृप भोसला दिनमणी वीराजिला हे क्षिती ॥ २ ॥
भूपें मस्तकिं बादली भरजरी मंदील तो बांधिला ।
तेजें आधिकता त्रिषूपरि असे दैदीप्य वीराजिला ॥
तैशी चादर उंच ते भरजरी आंगावरी घेतली ।
पटका तो कटिं वेष्टिला निजकरें आपूर्वता दाविली ॥ ३ ॥
पायीं घालुनि चोणळा वरि बरा कांचा नृपें बांधिला ।
खानाचा जिव घ्यावया निजबळें शाहजी सुनू चालिला ॥

अनुक्रमणिका

क्रोधें कंपित अंतरीं म्हणतसे त्या अफजला मारितों ।
आलाहे मतिमंद पामर कसा तात्काळ निर्दाळितों ॥ ४ ॥
जाणा वीज दुजी फिरंग तुळजा पैं बीववा हस्तकीं ।
तैसे खेटक वामखें विलसलीं तीं तीव्र पाहा निकीं ॥
स्मश्रू पीळुनियां सकोप हृदयीं अफ्जल्ल वीलोकितां ।
याचा प्राण हरीन याच समयीं नाहीं दुजा रक्षिता ॥ ५ ॥

येणेंप्रमाणें आंगावरि वस्त्रालंकार घालून श्रीजगदंबेचे दर्शनाकरितां देवघरांत इष्ट मंडळीसह जाऊन श्रीचे चरणीं मस्तक ठेवून हात जोडून अनन्यभावें प्रार्थना केली यदर्थी श्लोकः—

श्रीअंबे [सु] कृपा [तुवां] करुनियां निर्दाळिजे अफजला ।
आला हा कपटी तयासि चपळें दावीं प्रभेची लिला ॥
माझा हा अभिमान [आइ] तुजला श्री रेणुके स्वामिणी ।
शीवाजी नृप भोंसल्यास वर दे प्रत्यक्ष चिंतामणी ॥ १ ॥
प्रार्थीतां कर जोडुनी शिवनृपें कौतूक झालें अती ।
दिधलीं मस्तकिचीं प्रसाद सुमनें इच्छीत दासाप्रती ॥
आतांहे भय काय जाण हृदयीं दंडावया पामरा ।
ऐसी हे वदलीस नेमवचनें संतोष राजेश्वरा ॥ २ ॥

येणेप्रमाणें दर्शन होऊन तसेच मातुश्रीकडे जाऊन चरणीं मस्तक ठेविलें. यदर्थी श्लोकः—

जीजाऊ चरणावरी नृपवरें ठेवूनियां मस्तका ।
आज्ञा अर्पणता करींच जननी संपादितूं कौतुका ॥
आला भेटिस आफजल् हिनमती कापटय चित्तीं असे ।
मृत्योनें वरिला म्हणोनि बकरा दाणीस मी देतसें ॥ १ ॥
शिवबा तूं जय पावशील चपळें भीमाहुनी आगळा ।
माझा पूर्ण अशीस जाणचि असे आगाध तूझी लिला ॥
श्री अंबा वरदेंच येवन अरी पायातळीं घालिजे ।
विजयातें वरुनी सनेम गरिमा विस्तीर्णता ती किजे ॥ २ ॥
कुंतीचे सुत भीम अर्जुन जसे तैसाचि तूं भूतळीं ।
बापा आर्य-शिखामणीच असशी तूं भोंसल्याचे कुळीं ॥
वेगें कौतुक दाखवींच समरीं मारूनियां अफजला ।
राज्याची अभिवृद्धि पूर्ण करणें आशीस माझा तुला ॥ ३ ॥
कुंतीचे अजि पंगतीस बसवीं तूं शीवबा रे मुला ।

भीमें कीचक मारुनी भुजबळें कीर्तिध्वजू लाविला ॥
तैसें या समयीं करूनि सकळां कौतूक हें दाविजे ।
अफ्जल्ला वधुनी स्वभाळें टिकला त्या शोणितें लाविजे ॥ ४ ॥
माते आशिस पूर्ण जाणाचि तुझा मी मस्तकीं वंदिला ।
सिंहासन्मुख जंबुका गति नसे हा निश्चयो कल्पिला ॥
अफ्जल्ला वधुनी जयास वरितों अंबाप्रसादें जनीं ।
तूझा पुत्र तरीच जाण जननी दंडीन दुष्टा रणीं ॥ ५ ॥
जीजाऊ वचनें वदेच शिवबा मारी त्वरें अफ्जला ।
यातें जीतहि सोडशील तर रे हे आण माझी तुला ॥
कपटी पामर पातला हिनमती म्हैसा तया लक्षिजे ।
दाणा देउनियां रणीं शिर करीं छेदूनियां आणिजे ॥ ६ ॥

ऐशी आज्ञा जाहली ती मस्तकीं वंदून शिवा महाल्या व संभाजी कावजी चोपदार घेऊन जलदीनें सातवे सदरेजवळ गेले. तों पंतानीं पुढें येऊन हातीं धरून भेटी करवून खानास सात हातांचे अंतरानें बसविलें. महाराज सदरेवर मौन्य. खान बेनवा बुद्धिभ्रंशें क्रोधें नेत्र वटारून कांहीं भय न धरितां मद्यपी गर्वोक्त कठोरशब्दें अविचारपणें बोलों लागला. पदर्थीं श्लोकः–

आज्ञा घेउनियां नृपाळ चपळें आला सभाभूवनीं ।
अफ्जल्ला हृदयींच विव्हळ असे आ ज्ञी क झाला जनीं ॥
जीवित्वाप्रति मूकलाचि दिसतो अन्यत्र नाहीं कदा ।
आयुष्यावधि पूर्णताच भरली उन्माद झाला सदा ॥ १ ॥
अफ्जल चालुनि येतसे निजहिता भेटावयातें नृपा ।
भेढोनी मतिमंद वाजट कसा आज्ञीक मारी फका ॥
आला काळ समीप पूर्ण घटिका पैं पातली येक्षणीं ।
शीवाजी सरजा समर्थ नृपती दंडील यातें रणीं ॥ २ ॥
देखोनी सदरे मनांत जळला हे बादशाला नसे ।
झाला विस्मित अंतरीं मुढमती वीचित्रता हो दिसे ॥
शाहाजी सूत समर्थ येक अवनी घेईल वीजापुरा ।
ऐसा निश्चय अंतरींच गमला त्या दुर्मती पामरा ॥ ३ ॥
क्रोधें कांपतसे थरारुनि वपू आरक्त नेत्रां करीं ।
ऐकोनी नृपवाक्य जाण हृदयीं आनिष्टता वीवरी ॥
मद्यें उन्मत होउनी भुकतसे श्वानापरी तो कसा ।
शीवाजीनृप सागरापरि असे आलक्षिलें वायसा ॥ ४ ॥

[कारण] तो ग्रंथ पाहून आचार्यांस फार समाधान झालें. मग आचार्य स्वामींचा निरोप घेऊन आपले गांवास गेले. असा चमत्कार झाला.

नंतर एके दिवशीं प्रातःकाळीं जयरामस्वामी हातांत खराटा घेऊन समाधी पाशीं सभोंवतालची जागा लोटून काढीत होते तों इतक्यांत बादशाहा यांनीं आपला कारकून व पालखी स्वामींस बोलावण्याकरितां पाठवून दिली. ते वडगांवीं येऊन पोहोंचले आणि स्वामींस नमस्कार करून [त्यांनीं] सांगितलें कीं आपणास बादशाहानें बोलाविलें आहे. मग स्वामींनीं विचारलें कीं, आम्हांस कोणते कारणावद्दल बोलाविलें आहे. तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, बादशाहाचा नियम असा आहे कीं, दररोज कोणी भगवद्भक्त याचें दर्शन घेऊन नंतर भोजन करावें. हल्लीं स्वारी चितळी मुक्कामीं राहिली आहे. आपण येऊन दर्शनाचा लाभ द्यावा. मग स्वामी बोलले कीं, आमची बादशाहास कशावरून माहिती झाली. कारकुनानें सांगितलें कीं, चितळी येथें सर्वत्र मंडळीस बादशाहानें विचारलें कीं, येथें कोणी भगवद्भक्त असल्यास दर्शनास घेऊन यावें. गांववाल्यांनीं सांगितलें कीं, येथून चार कोसांवर वडगांव येथें जयरामस्वामी या नांवाचा एक भगवद्भक्त आहे. त्याजवरून आम्ही येथें आपणाकडे आलों तर आपण चलावें. नंतर स्वामी सद्गुरुनाथ कृष्णाप्पास्वामी यांस साष्टांग नमस्कार करून समाधि लोटण्याचा खराटा होता तो पालखींत घालून आपण पालखीची दांडी धरून श्रीकृष्ण श्रीकृष्ण असा उच्चार करीत बादशाहाचे कचेरीस आले. हें वर्तमान बादशाहास कळलें नंतर बादशाहानें आपले अष्टप्रधान बरोबर घेऊन, स्वामींस आडवे जाऊन, नमस्कार करून आपले पाशीं आणून बसविलें आणि त्यांस विचारलें कीं, आपण पालखींत न बसण्याचें कारण काय तें सांगावें. मग स्वामी बोलले कीं, आमचे योग्यतेपरीस आमचे खराटयाची योग्यता फार आहे. कारण कीं, त्याचें शरीर समाधीचे भोंवतीं लोटतांना झिजतें तसें आमचें शरीर झिजत नाहीं. असें सांगतांच बादशाहाचे मनांत याची गुरुभक्ति व हा कसा आहे हें पहावें [असें आलें] म्हणून आपले कोणी सेवक होते त्यांस सांगितलें कीं, रुप्याचे ताटांत मांस घालून वरती शर्करा घालून स्वामींचे पुढें आणून ठेवावें. असें बादशाहानें एकांतीं सांगतां च त्या सेवकानें बादशाहाचे आज्ञेप्रमाणें ताटांत मांस घालून वर शर्करा घालून स्वामींचे पुढें कचेरींत ठेविलें. नंतर बादशाहानें स्वामींस विचारिलें कीं, या ताटामध्यें काय आहे तो जिन्नस आम्हांस सांगावा. असें तीन वेळ विचारिलें. नंतर स्वामींनीं सांगितलें कीं, या ताटांत तुळशी व नानाप्रकारचीं पुष्पें आहेत. असें बोलतांच बादशाहानें ताटावरील सरपोस काढून पाहिलें तों स्वामींचे आज्ञेप्रमाणें फुलें व तुळशी निघाल्या. त्या

पाहून बादशाहास व सर्व लोकांस आश्चर्य वाटलें. नंतर बादशाहानें जयरामस्वामींचे पायांवर मस्तक ठेवून हात जोडून विनंति केली कीं, आमचा हेतु कांहीं शास्त्रांतील अर्थ पहावयाचा आहे तो आपण सांगावा म्हणजे आमचे दिलाची खात्री होईल. आम्हीं पुष्कळ शास्त्री व भगवदभक्त यांस विचारिलें परंतु आमचा संशय जात नाहीं त्यास आपण स्वमुखें सांगावा. नंतर स्वामी बादशाहास एकांतीं नेऊन त्याच्या मनाची खात्री व समाधान करून त्याचा निरोप घेऊन निघाले. त्या वेळेस बादशाहानें स्वामींस कांहीं गुरूचे समाधीचे उत्साहास गांवें दिलीं त्याजबद्दलचीं सनदापत्रें करून आपले स्वदस्तुरचीं चिन्हें करून स्वामींचे पुढें ठेवून साष्टांग नमस्कार घालून सांगितलें कीं, आपण हें घेऊन जावें. मग स्वामी कांहीं एक न घेतां बादशाहाचा निरोप घेऊन वडगांवास आले आणि श्रीगुरूचे सेवेस लागले.

आषाढी कार्तिकीची वारी प्रतिवर्षी करून श्रीकृष्णाप्पास्वामींचे समाधीपुढें बसून श्रीभागवतांतील दशम स्कंध याजवर प्राकृत टीका ओंव्यापर करून पूर्वार्ध व उत्तरार्ध या नांवाचा जयरामस्वामींनीं ग्रंथ केला आहे आणि सीतास्वयंवर या नांवाचा ग्रंथ व अपरोक्ष अनुभव असे ग्रंथ केले. पदें व अभंग ही केले आहेत. कृष्णजन्मकाळाचें चरित्र व गोपाळकाला श्रीहरीनें लोकांत चरित्र केलें आहे तसें स्वामींनीं करून कितीएक लोकांचा उद्धार केला. असो. कृष्णाप्पास्वामींची समाधि झाल्यापासून ४९ वर्षें पर्यंत जयरामस्वामींनीं कृष्णकीर्तन व तीर्थयात्रा करून काळ घालविला. नंतर शके १५९४ भाद्रपद वद्य ११ चे दिवशीं प्रातःकाळीं स्नान करून नित्य नेमाप्रमाणें गुरूच्या समाधीची पूजा करून कृष्णाप्पा स्वामींचे समाधीपुढें आसन घालून पूर्वमुख करून बसले आणि आपली शिष्य मंडळी जवळ बोलावून जयरामस्वामी यांनीं मनांत स्मरण केलें कीं, आज श्रीरामदासस्वामी, रंगनाथस्वामी, आनंदमूर्तिस्वामी, व केशवस्वामी हे जवळ असावे. असें स्मरण करण्याबरोबर चारी मंडळी आपापले गांवाहून आली आणि श्रीजयरामस्वामी आपले आसनावर अष्टांग योग धारण करून नेत्र झांकून कोणाकडे न पाहतां बसले आहेत असें रंगनाथस्वामी व रामदासस्वामी स्वामींस हाक मारून म्हणूं लागले कीं, आमचें स्मरण करण्याचें कारण काय. आपले प्रकृतीस उपाधि दिसते. मी आपणापाशीं बोलतों मी कोण आहें तें सांगावें. मग जयरामस्वामी नेत्र उघडून रंगनाथस्वामींकडे पाहून म्हणूं लागले कीं, माझी अवस्था विचारशील तर मी कृष्णनामाचें कीर्तन व कृष्णगुरूच्या चरणाचें चिंतन करीत स्वस्थ बसलों आहें. देहाचे प्रकृतीची भावना विचारशील तर

देहास सहस्र विंचवांच्या वेदना आहेत. देहप्रकृतीस काय आहे म्हणून विचारशील तर माझे हातास राजफोड झाला आहे. ह्या योगानें देहप्रकृतीचा विचार असा आहे व मी कोण म्हणशील तर त्याचा विचार मी फार करितों परंतु मी कोण? तूं कोण? हें मला कांहीं च समजत नाहीं. कां कळत नाहीं असें म्हणशील तर दृश्य वस्तु होती ती द्रष्टा झाली त्याजमुळें दृश्य द्रष्टा निरखी कवणा ? असें श्रीजयरामस्वामी रंगनाथस्वामींस उत्तर करून [स्वस्थ]बसले. मग रंगनाथस्वामी म्हणूं लागले कीं, एवढी योग्यता कशानें आली ! जयरामस्वामी बोलले कीं, सद्गुरुदाता दयाळू झाला. श्रीकृष्ण कृपाळू झाला. असें बोलून रंगनाथस्वामी यांचे बोलण्याची समजूत घालून [स्वस्थ]बसले. नंतर जयरास्वामींनीं सर्वांकडे पाहून म्हटलें कीं, माझ्या गोपाळास हाक मारून आणावें. नंतर स्वामी यांस स्वामींपाशीं घेऊन आले. तों श्रीजयरामस्वामी नेत्र झांकून आहेत. जयरास्वामी समाविस्थ होणार हा मजकूर गोपाळस्वामींस माहीहता. त्याचें कारण काय असें म्हणाल तर गोपाळस्वामी यांनीं श्रीजस्वामी यांचे घोड्याची सेवा करून सदा सर्वकाळ असावें. नंतर जयरामस्वामी यांस रंगनाथस्वामींनीं सांगितलें कीं, आपले आज्ञेप्रमाणें गोपाळस्वामी आपणापुढें येऊन उभे राहिले आहेत. स्वामींच्या समाधीचा समय आतां च आहे. असें गोपाळस्वामी यांस सांगतांच गोपाळस्वामी यांनीं मोठ्यानें हंबरडा फोडिला आणि रडूं लागले. नंतर जयरामस्वामी यांनीं गोपाळस्वामी यांस विचारिलें कीं, तुजला असें दुःख काय प्राप्त झालें तें सांगावें. गोपाळस्वामी बोलले कीं, आपल्या घोड्यावर कोणीं बसावें व म्यां स्वामी म्हणून, कोणास हाक मारावी. असें बोलून स्वामींचें चरित्र मनांत आणून फार फार विलाप केला. नंतर जयरामस्वामी यांनीं गोपाळस्वामी यांस आपलेपाशीं बोलावून आपले हातांतील माळ गोपाळस्वामी यांचे गळ्यांत घातली आणि बोलले कीं, आजपर्यंत आमच्या घोड्यावर जयरामकृष्ण बसत होता आतां येथून गोपाळजयराम बसेल. असें सांगून सर्वत्र मंडळी लहानथोर यांस सांगितलें कीं आमच्या श्रीसद्गुरुनाथ कृष्णाप्पास्वामी यांचे पुण्यतिथीस सर्वत्रांनीं येत असावें. नंतर आपण श्रीकृष्णनामाचा उच्चार दीर्घ स्वरें करून जयरामस्वामी हे रंगनाथस्वामी, आनंदमूर्तिस्वामी, केशवस्वामी, व जयरामस्वामींचे गुरुबंधु गुरुस्वामी, अशी मंडळी पाहत असतां श्रीजयरामस्वामी श्रीसदगुरूचे स्वरूपीं मिळून गेले. नंतर रंगनाथस्वामी यांनीं जवळ येऊन पाहिलें आणि सर्वत्रांस सांगितलें कीं, जयराम असा जो भाव तो लोपला. असें सांगून गोपाळस्वामी यांचें सर्वत्रांनीं शांतवन करून श्रीकृष्णाप्पास्वामी यांचे समाधीपुढें जयरामस्वामींची समाधि

बांधून एक वर्षपर्यंत कीर्तनसमारंभ केला. याप्रमाणे जयरामस्वामींचें चरित्र संपूर्ण समाप्त झालें. हें चारित्र कोणी वाचतील अगर ऐकतील त्याचे मनोरथ श्रीजयरामस्वामी पूर्ण करितील.

## श्रीगोपाळस्वामी शके १५९४--१६१२.

नंतर असा समारंभ एक वर्षपर्यंत करून सर्वत्र मंडळीस जयरामस्वामींचे पुण्यतिथीस बोलावून उत्साह सांग करून गोपाळस्वामी समाधीची सेवा करीत होते. पूर्वीं गोपाळस्वामी आपले तीर्थरूप यांस देवाज्ञा झाली असतां एक दोन वेळा काशीयात्रेस गेले होते. परंतु त्यांनीं गयावर्जन करून पिंड कांहीं दिला नाहीं. पिंड न द्यावयास कारण असें कीं गोपाळस्वामी जयरामस्वामी यांस आपले वडील व गुरु असें म्हणत होते. कोणीं विचारिलें तर माझा व वडगांवांत आहे असें सांगत असावें. नंतर गोपाळस्वामी काशीस ऊन जयरामस्वामींचें दशांत कर्म करून विष्णुपदावर गयावर्जन व धर्म क आपले गांवास आले असतां सद्गुरुनाथ जयरामस्वामी खेरीजकरून कोणास- ही नमस्कार त्यांनीं केला नाहीं आणि स्वामी हीं अक्षरें कोणास म्हटलीं नाहींत. अशी निष्ठा जयरामस्वामी यांचे ठायीं असून स्वामींचीं सेवा करीत होते.

एक वेळ स्वामींचे उत्साहास सर्वत्र मंडळी येऊन उत्साह सांग करून [सर्वांनीं] बेत केला कीं, श्रीशांतेश्वरस्वामी यांचे समाधीचे दर्शनास जावें. असें म्हणून श्रीरामदासस्वामी व श्रीरंगनाथस्वामी श्रीगोपाळस्वामी सुद्धां श्रीशांतेश्वरस्वामींचे दर्शनास गेले आणि सर्वत्रांनीं त्यांस नमस्कार केला. परंतु गोपाळस्वामी यांनीं केला नाहीं. नंतर रामदासस्वामी गोपाळस्वामींस म्हणूं लागले कीं, आम्हीं सर्वत्र आजपर्यंत ऐकत होतों कीं, गोपाळस्वामी जयरामस्वामींखेरीजकरून कोणास ही नमस्कार करीत नाहींत. तें आज प्रत्यक्ष आम्हीं पाहिलें. श्रीशांतेश्वरस्वामींच्या समाधीवर ब्रह्मादिक येऊन लोळतात त्या समाधीस तूं नमस्कार केला नाहींस याचें कारण काय तें आम्हांस सांगावें. असें गोपाळस्वामींस बोलतांच गोपाळस्वामी यांनीं उत्तर केलें कीं, ज्या देवास नमस्कार करीन त्याचा फडशा होईल. एक सद्गुरुनाथ जयरामखेरीज माझा नमस्कार कोणास सहन होणार नाहीं याचा अनुभव तुम्हांस दाखवितों. असें म्हणून श्रीशंभुमहादेव यांचें दर्शन घेऊन परत जातांना एक मोठा हत्तीच्या आंगासारखा धोंडा होता त्यापुढें जाऊन सर्वत्र मंडळी पहात असतां त्या धोंड्यास नमस्कार केला. तों त्याचे तुकडे रेवेसारखे होऊन त्या जागयावर कांहीं राहिलें नाहीं असें सर्वांनीं पाहून गोपाळस्वामी यांस म्हणूं लागले कीं, तूं आजपासून देवास किंवा कोणासही

नमस्कार करूं नकोस. आम्हीं पुष्कळ गुरुउपासक पाहिले परंतु तुझ्यासारखा गुरुउपासक पाहिला नाहीं. अशी त्यांचे मनाची खात्री झाली.

नंतर तेथून निघून वडगांवास आले आणि एका ब्राह्मणाचे घरीं जाऊन उतरले. त्या ब्राह्मणाचें आडनांव पारखे व त्याचें नांव विठोबा. ते आपले घरीं गुरुकृपा व्हावी म्हणून निरशनवृत्ति घेऊन श्रीकृष्णनामा जप करीत होते आणि मुरलीधराची पूजा यथासांग करून त्याची दररोज प्रार्थना करीत होते कीं, मजवर गुरुकृपा होऊन मजला माझ्या स्वरूपस्थितीचें ज्ञान देववावें. हें जर तुम्हीं न द्याल तर पायांवर देह टाकीन. याप्रमाणें ते दिवशीं रात्रीं देवाची प्रार्थना करून निद्रित झाले. तों स्वप्नामध्यें रात्रीचे ठायीं श्रीकृष्णाची मूर्ति येऊन तिनें सांगितलें कीं, तुझा गुरु तुझे घरीं उतरला आहे त्याचा उपदेश घेऊन त्याची सेवा कर म्हणजे तुझे मनोरथ पूर्ण होतील. असें सांगून श्रीहरि अंतर्धान पावले. मग विठोबा जागृत होऊन मनांत म्हणूं लागले कीं, तुझा गुरु तुझे घरास आला आहे असें सांगितलें आणि येथें तर ६ असामी आहेत. यांतील म्या कोणता गुरु करावा असें म्हणून श्रीकृष्णनामाचें भजन करून निद्रित झाले. तों श्रीहरि त्याचे हातास धरून जी मंडळी निद्रित झाली होती त्यांत गोपाळस्वामी निद्रित झाले होते त्यांचे हातांत हात घालून आपण गुप्त झाले. नंतर विठोबा जागृत झाले. तों गोपाळस्वामींचे हातांत हात आहे असें पाहून त्यांचे जवळ बसले. नंतर गोपाळस्वामीही जागृत झाले. हें पाहून त्यांचे पायांवर मस्तक ठेविलें आणि म्हणूं लागले कीं, मजला रात्रीं दृष्टांत झाला त्यांत प्रत्यक्ष श्रीहरि येऊन माझे हातास धरून तुमच्या हातांत हात घातला आणि मजला सांगितलें कीं, तुझा गुरु हाच आहे तो तुझी इच्छा सर्व पूर्ण करील. असें म्हणून आपण गुप्त झाले त्यास माझा कांहीं अधिकार न पहातां मजवर कृपा करावी असें म्हणून चरणांवर गडबडां लोळूं लागले. मग गोपाळस्वामी यांनीं मनांत सर्व विचार आणून त्यास एकांतस्थानीं नेऊन उपदेश करून त्यांची चित्तवृत्ति स्वस्थ ठिकाणीं नेऊन गुरुकृपेचें सामर्थ्य त्यांस दाखविलें. नंतर तेथें कांहीं एक दिवस राहून आपले वडगांवास विठ्ठलस्वामी यांस बरोबर घेऊन येते झाले. नंतर चार मंडळी बरोबर होती ते गोपाळस्वामी यांचा निरोप घेऊन आपले गांवास गेले.

असे गोपाळस्वामी समाधीची सेवा करून वडगांवीं राहिले होते तों एके दिवशीं भूषणगड येथें राहणारा चैत्रजी म्हणून एक मराठा होता त्याच्यापाशीं २०० लोक होते. तो कोणे एके दिवशीं वडगांवावरून जाऊं लागला आणि स्वामींच्या समाधीपाशीं येऊन म्हणूं लागला कीं, या नवीन समाधि माझे हुकुमा-

खेरीज या जाग्यांत कोणी केल्या आहेत ? असें गांवांतील पाटील यास बोलावून आणून त्यानें विचारिलें. पाटील यांनीं सांगितलें कीं, गोपाळस्वामी हे मठ बांधून राहिले आहेत त्यांचे गुरूच्या समाधि आहेत. नंतर गोपाळस्वामी यांजपाशीं आला. तों ते स्नानसंध्या करून ध्यानस्थ बसले आहेत. असें पाहून चैत्रजी मोठा दुष्ट होता तो म्हणूं लागला कीं, काय हा ब्राह्मण माजला आहे. आम्ही आलों असतां आम्हांस या असें ही म्हणेना. बरें असो काय चिंता आहे ! आजपासून सातवे दिवशीं समाधि उलगडून टाकितों. येथें चिरा एक ही राहूं देणार नाहीं. तर मी चैत्रजी होईन असें म्हणून आपले गांवास गेला. नंतर गोपाळस्वामींचे ध्यान विसर्जन झाल्यावर शिष्य मंडळी यांनीं चैत्रजीचा मजकूर गोपाळस्वामी यांस सांगितला. मंडळीस फार भय प्राप्त झालें. मग गोपाळस्वामी म्हणाले कीं, तुम्हांस त्याचें भय फार वाटतें तर तो चैत्रजी आजपासून सातवे दिवशीं मृत्यु पावेल. अशीं स्वामींच्या मुखांतील अक्षरें निघालीं. निघावयाचीं नाहींत परंतु आपले गुरु जयरामस्वामी यांचे समाधीची छळणा केली याजमुळें अशीं अक्षरें निघालीं. नंतर सातवे दिवशीं वडगांवास लोकांनीं येऊन बातमी सांगितली कीं, चैत्रजी ज्वर येऊन मृत्यु पावला. असा चमत्कार झाला. असे गोपाळस्वामी यांनीं स्वामींचे समाधीची सेवा करीत कांहीं दिवस घालविले.

नंतर एके दिवशी विठ्ठलस्वामी यांस सांगितलें कीं, तुम्ही वडगांवीं स्वामींची सेवा करून स्वस्थ रहावें आम्हास स्वामींचे आज्ञेप्रमाणें महायात्रेस जाण्याचें आहे असें म्हणून गोपाळस्वामी श्रीजयरामस्वामी यांचे समाधीचा निरोप घेऊन तीर्थे करीत करीत काशीस गेले. तेथें त्रिस्थळी यात्रेचा विधि सारून अनंतदेव यांच्या मठांत राहते झाले. एक वर्षपर्यंत राहिले. तों कांहीं एक दिवसांनीं नवज्वराची भावना झाली आणि त्या ज्वरास पांच दिवस झाले. नंतर गोपाळस्वामी अनंतदेव यांस हाक मारून म्हणूं लागले कीं, हे देवा माझे स्वामीचे समाधीचा अंतर पडला हें मजला दुःख फार झालें. तर आतां माझ्या दृष्टीस समाधि पडेल असा योग करावा या पेक्षां आपणास दुसरें कांहीं मागणें नाहीं. असें म्हणून अनंतदेव यांच्या पायांवर मस्तक ठेविलें. नंतर अनंतदेव गोपाळस्वामींस म्हणूं लागले कीं, या क्षेत्रांत मरण पावण्यासाठीं अमरेंद्र इच्छा करितो तर अशा क्षेत्रांत मरण तुम्हांस येतें हें फार चांगलें असें असून तुम्ही मोठ्यांचे शिष्य म्हणवितां आणि येथून निघून जातों असें म्हणतां. तुम्हांस कांहीं एक ज्ञान नाहीं असें मला वाटतें. असें बोलून अनंतदेव स्वस्थ राहिले. नंतर गोपाळस्वामी त्यांस म्हणूं लागले कीं, माझ्या स्वामींचे समाधीवरून अशीं काशीक्षेत्रें कोट्यावधि ओंवाळून टाकिलीं. तरी समाधीच्या दर्शनाची सर

त्यांस यावयाची नाहीं. असें आपल्या गुरूच्या समाधीचें सामर्थ्य आहे. तर आम्हांस कृपा करून वडगांवास पाठवून द्यावें. असें बोलतां च क्षणभर अनंतदेव मनांत विचार करून म्हणूं लागले कीं, या शिष्याची गुरुभक्ति फार. असा गुरुभक्त आम्हांस कोठें आढळून आला नाहीं. तर याचा नवज्वर काढून याजला स्वामींचे दर्शनास पाठवून द्यावें. असें म्हणून आपला हात उचलून गोपाळस्वामींच्या आंगावरून फिरवून नवज्वरास सांगितलें कीं गोपाळस्वामी वडगांवास जात तों पर्यंत त्याजला उपद्रव करूं नये. अशी ताकीद ज्वरास केली. नंतर गोपाळस्वामी यांचा ज्वर नाहींसा झाला आणि त्यांच्या शरीरास नीट वाटलें. नंतर कांहीं एक दिवसांनीं गोपाळस्वामी वडगांवास आले आणि स्वामींचे समाधीचें दर्शन त्यांनीं घेतलें. त्या पासून जें सुख झालें तें सांगतां पुरवत नाहीं. नंतर भाद्रपदमासीं श्रीजयरामस्वामी यांची पुण्यतीथ आली. ती करून नवज्वराची बाकी काशीक्षेत्रांत राहिली होती ती [ फेडण्याकरितां ] नवज्वरास हाक मारिली आणि सांगितलें कीं, आपली बाकी राहिली आहे ती घ्यावी. आम्ही आतां सद्गुरुनाथ जयरामस्वामी यांच्या स्वरूपांत मिळून जाणार. असें नवज्वरास सांगतां च गोपाळस्वामीच्या शरीरांत त्यानें प्रवेश केला आणि आपले दिवस कमी होते ते सर्व भरून घेतले. नंतर शके १६१२ आश्विन वद्य १ ते दिवशीं प्रातःकाळीं उठून आपला शिष्य विठ्ठलस्वामी यांच्यासह देवालयांत येऊन श्रीकृष्णाप्पास्वामी यांच्या समाधीचें दर्शन घेऊन नंतर आपल्या मठास आले आणि पूर्वाभिमुख आसन घालून त्या आसनावर आपण बसले आणि विठ्ठलस्वामी यांस हाक मारून सांगितलें कीं, आम्ही सद्गुरुनाथ यांचे स्वरूपीं मिळून जाणार. असें सांगून आपली जपाची माळ होती ती सर्व मंडळी पहात असतांना विठ्ठल स्वामींच्या गळ्यांत घालून त्यांस सांगितलें कीं जयरामस्वामींच्या व कृष्णाप्पास्वामींच्या समाधींची सेवा करून स्वस्थ रहावें. असें सांगून आपण श्रीकृष्ण जयराम असें म्हणत म्हणत सर्व मंडळी पहात असतां प्राणायाम करून आत्मा ब्रह्मांडास नेला तेव्हां मस्तक फोडून ज्योती बाहेर निघाली आणि विजेसारखा लोळ सर्वांचे दृष्टीस पडून स्वामींच्या देवालयामध्यें श्रीकृष्णाप्पास्वामींस उजवें घालून व जयरामस्वामींस उजवें घालून स्वामींच्या समाधींत मोठा आगीच्या लोळासारखा तेजस्वी लोळ येऊन गुप्त झाला. हें कशावरून तर सांगतों. ते दिवशीं कोणी ब्राह्मणमंडळी वाटसरू येऊन देवालयांत उतरली होती. ते दृष्टीनें तो लोळ पाहून आपआपल्यांत बोलूं लागले कीं, ही वीज म्हणावी तर आभाळ पर्जन्य ही नाहीं. असें असून हें काय! देवकृत्यावाणी हें कृत्य दिसतें. असें एकमेकांत बोलतात तों गांवांतील कोणी ग्रामस्थ लोक देवाचे दर्शनास आले

होते त्यांनीं त्या ब्राह्मणांस सांगितलें कीं. आमचे गांवांत मोठे सत्पुरुष गोपाळस्वामी या नांवाचे होते ते आज समाधिस्थ झाले. त्यांच्या मस्तकांतून मोठें तेज निघालें. असें ग्रामस्थ ब्राह्मण मंडळी यांनीं सांगतां च वाटसरू ब्राह्मणमंडळी देवालयांत राहिली होती त्यांनीं निश्चय केला कीं, जो सत्पुरुष समाधिस्थ झाला तो मोठा गुरुभक्त होता म्हणून गुरूच्या समाधींत जाऊन गुरूशीं मिळून गेला. तर आतां मठांत जाऊन त्याचें दर्शन घ्यावें. असें म्हणून मठांत आले आणि सर्वत्र मंडळी यांस देवालयामध्यें मजकूर झाला तो सांगितला. नंतर सर्वत्र तो ऐकून बोलूं लागले कीं, गोपाळस्वामी हे आपले गुरूचे स्वरूपीं मिळून गेले. असो.

गोपाळस्वामी यांचे शिष्य विठ्ठलस्वामी समाधीचा समारंभ करून एक संवत्सरपर्यंत कीर्तनसमारंभ करिते झाले. गोपाळस्वामी यांचे समाधीचे वेळेस सर्वत्र देव भगवद्भक्त समारंभ पहावयास आले होते. गोपाळस्वामींची समाधि कोणती म्हणाल तरी जयरामस्वामींच्या समाधीपुढें आहे ती. हें गोपाळस्वामीचें चरित्र कोणी भगवद्भक्त श्रवण करतील त्यांचे मनोरथ पूर्ण होतील.

## विठ्ठलस्वामी शके १६१२–१६४१.

गोपाळस्वामींचे शिष्य विठ्ठलस्वामी गोपाळस्वामी यांची समाधि झाल्यावर समाधीची सेवा करीत असून गुरूनें सांगितलें त्याप्रमाणें चालत असतांना मुनीश्वरस्वामी, जयरामस्वामींचे गुरुबंधु गुरुस्वामी खटावीं राहत होते त्यांपाशीं कांहीं एक दिवस होते ते, गोपाळस्वामींची समाधि झाल्यावर वडगांवीं येऊन विठ्ठलस्वामी यांजपाशीं राहिले आणि स्वामींची सेवा करूं लागले. गोपाळस्वामी यांचा उत्साह पांच चार दिवस राहिला आहे तों विठ्ठलस्वामी हे एके वर्षीं मुनीश्वरस्वामींस म्हणूं लागले कीं, उत्साह जवळ आला असून कांहीं तर्तूद नाहीं. वरकड जिनसांचा बंदोबस्त कसा तरी होईल, परंतु उत्साहास दहा बारा मण गहूं लागतात त्यांची तोड कांहीं निघत नाहीं तर तुम्हीं याची तर्तूद करून ठेवावी. असें मुनीश्वरस्वामी यांस सांगून आपण ध्यानस्थ बसले. नंतर मुनीश्वरस्वामी यांनीं कोठें कोठें शोध केला. परंतु महागाईमुळें गहूं मिळेनात. नंतर मुनीश्वरस्वामी यांनीं उत्साहाची नड आहे असें जाणून गड्यांस सांगितलें कीं, जयरामस्वामी यांचे वेळेचें गव्हांचें पेंव मठांत आहे तें उघडून गहूं दहा-बारा मण आणावे. गडी बोलले कीं, आम्हांस पेंवाचा मजकूर कांहीं माहीत नाहीं व आज पांचपन्नास वर्षें चाकरीस आहों परंतु कधीं कोणी पेंवाची गोष्ट बोलले नाहींत ! असें बोलतांच मुनीश्वरस्वामींनीं श्रीजयरामस्वामींचे समाधीचें तीर्थ आपले हातांत घेऊन भूमीवर टाकून गड्यांस सांगितलें कीं,

जवळी येतां सुसर पाहुनी, मागें परते भ्याला ॥ २९ ॥
स्नान करोनि तीरें पातले, धरिती कौपीनाला ॥
भस्म लावुनी कंठिं घालिती, रुद्राक्षांच्या माळा ॥ ३० ॥
मध्यान्हीं सुस्नात सर्व ही, पवित्रपाणी झाले ॥
ब्रह्मकर्म मुनि समाप्त करुनी, कांहीं परत निघाले ॥ ३१ ॥

## दिंडी.

ऊर्ध्वदृष्टी कित्येक उभे नीरीं । मुनी बसले अनेक रम्य तीरीं ॥
कंकपक्षी देखोनि मुनीध्याना । तसे होती घालोनि पोंठि माना ॥ ३२ ॥
जिचे तोयीं मत्स्यादि जंतु राहे । शीत मंजुळ सूगंध वायु वाहे ॥
गमे स्पर्शे निष्पाप करी काया । वदा ईचें माहात्म्य मुनीराया ॥ ३३ ॥

## वृत्त वसंततिलका.

ऐकोनि रामवचना मुनिगाधिजाला । आनंद होय पथिंचा श्रम ही निमाला ॥
रामा म्हणे मज तुवां अजि धन्य केलें । प्रश्नें सख्या सकल कल्मष दूर गेलें ॥३४
जीच्या तरंगपवनें पशु ही तरावे । स्नानें तसें सकल पातक संहरावें ॥
जीतें मुनींद्र सुर किन्नर सिद्ध गाती । ही राघवा हरिपदी सुरसिंधु गा ती ॥३५॥
ईचा अगाध महिमा विधि शेष भानू । वर्णूं न ते शकति मी वद काय वानूं ॥
विस्तार मंदमतिच्या वदनें कशाचा । होतो परंतु कथितो तुज अल्प साचा ॥३६॥
देई सुखासि इह लोक परत्र लोकीं । उंचा पदार्थ दुसरा न जगीं विलोकीं ॥
गंगेविणें म्हणउनी जगदीश्वरानें । ही मस्तकीं धरियली गिरिजावरानें ॥ ३७ ॥
सर्पा खगेंद्र धरुनी वदनीं वरोनी । जातां नदींत पडला अहि तो मरोनी ॥
तात्काळ होउनि चतुर्भुज त्या च पक्षी । राजावरी चढुनि विष्णुपदास लक्षी ॥३८॥

## वृत्त शार्दूलविक्रीडित.

गंगा हीं हरिपादपंकजभवा स्वर्गावरी राहिली ।
तेथें स्वर्गनदी म्हणोनि पहिले नांवाप्रती पावली ॥
तेथोनी मग शंकरें निजजटाजूटांतरीं वाहिली ।
आली भूमिवरी हरी अघ जरी पाप्यांनि ही गाहिली ॥ ३९ ॥
रामा पुण्यहरीपदांबुलहरीबिंदू शरीरा जरी ।
स्पर्शे तत्क्षणिं जो असेल पदरीं तत्पापवृंदा हरी ॥
घेतां नांव जिचें अनंत जनुचें जें पाप देहीं असे ।
गंगा त्या सकलासि घालवितसे ती भूवरी ही वसे ॥ ४० ॥

## वृत्त इंद्रवज्रा.

भागीरथी जान्हवि स्वर्गसिंधु । तारावया ही च जगास बंधु ॥

स्नानानिमित्तें निघतां पदांतीं । बा अश्वमेधक्रतुपुण्य देती ॥ ४१ ॥

**वृत्त कामदा.**

ऐकुनी पुन्हा राम बोलिला । कां शिवें शिरीं घेतलें इला ॥
विष्णुपाउलापासुनी अली । ही मुने कशी सांग भूतळीं ॥ ४२ ॥

**वृत्त उपजाति.**

भागीरथी कां इजला म्हणावें । कशी वदा जान्हवि नांव पावे ॥
आश्चर्य मातें बहु होत आहे । दीनार्थ जी भूवरि माय वाहे ॥ ४३ ॥
मुनी म्हणे आयिक रामराया । जो लागला मृत्युकरा मराया ॥
सकृत जरी घे नर नाम वाचे । तात्काळ नाशी भय तें भवाचें ॥४४॥

**वृत्त शार्दूलविक्रीडित.**

साकेताधिपनंदना हरिपदी गंगा जगन्माउली,
ऐकें सांगतसे सख्या तुज कशी स्वर्गीप्रती पावली ॥
जीच्या सानुज आयिकोनि सकला हो सच्चरित्रा सुखी,
नित्य श्रीकर सर्वदा हि तुझिया तन्नाम राहो मुखीं ॥ ४५ ॥
प्रल्हादात्मज जो विरोचन तया सत्पुत्र झाला बळी,
नामें सर्व सुरांसि जिंकुनि करी राज्य त्रिलोकीं बळी ॥
तन्नासें स्तविला रमेश अमरीं जो भक्तचिंतामणी,
घे तो कश्यपगेहिं जन्म अदितीपोटीं जगाचा धणी ॥ ४६ ॥

**वृत्त यूथिका.**

साक्षि जो सकलहृत्कमळीं वसे । अक्षिलागिं सुत होउनि तो दिसे ॥
ब्रह्मदेव सुर घेउनि ये तदा । कश्यपादि अवघे नमिती पदा ॥ ४७ ॥

**आर्या.**

ऱ्हस्वाकृति धरि म्हणुनी, वामन हें नांव ठेविलें बाळा ॥
उपनयनयोग्य झाला, ते चि क्षणिं देव शिक्षि जो काळा ॥ ४८ ॥

**वृत्त स्वागता.**

कश्यपादि मुनिवृंद तसाची । देववृंद करि आयति साची ॥
ब्रह्मदेव सकलेच्छित दे त्या । सावधान सुमुहूर्त वदे त्या ॥ ४९ ॥

**वृत्त शार्दूलविक्रीडित.**

गायत्री रवि दे कमंडलु विधी द्यौ च्छत्र दंडा शशी,
कौपीना अदिती कुशा मुनिपती कृष्णाजिना भू तशी ॥
सूत्रा गीष्पति माळ ब्रह्मयुवती पात्रा धनांचा पती,
शोभे वामन संस्कृती रुकनि त्या भिक्षेस देई सती ॥ ५० ॥

## वृत्त उपजाति.

ऐके तदा वामन यज्ञ चाले । बळीघरीं ब्राह्मण ही निघाले ॥
निघे स्वयें आवधि देवमाया । सुरेंद्र यातें निजराज्य द्याया ॥ ५१ ॥
यज्ञांगणीं ये बटु ब्रह्मचारी । मुखें वदे वेद समग्र चारी ॥
पाहोनि उत्थान समग्र घेती । तेजें तया आसन उंच देती ॥ ५२ ॥
बळी तया पाहुनि देवराया । प्रेमें नमी होउनि नम्र पायां ॥
म्हणे मला धन्य तुं आजि केलें । त्वद्दर्शनें कल्मष सर्व गेलें ॥ ५३ ॥
सिंहासनीं बैसवि वामनाला । संतोष झाला बळिच्या मनाला ॥
ब्रह्मादिकीं यद्यश शुद्ध गावें । पूजी तया दैत्यपती स्वभावें ॥ ५४ ॥

## वृत्त कामदा.

मग जें तुला पाहिजे असे । राय घे म्हणे सर्व देतसें ॥
ऐकुनी तया बोलिला हरी । सांग कोण त्वत्तुल्य भूवरी ॥ ५५ ॥
राजांचिये नांव राखिलें । एक मागतों पाहिजे दिलें ॥
मत्पदें धरा तूं त्रिपाद दे । ऐकुनी बळी बोलिला मदें ॥ ५६ ॥
गांव आथवा राज्य माग कीं । काय पाहिजे सांग आणखी ॥
देव बोलिला ईतुकें पुरे । लोभ केलिया काय ही नुरे ॥ ५७ ॥

## वृत्त पृथ्वी.

तदाग्रह विलोकुनी बळि तया त्रिलोकीश दे,
त्रिपाद पृथिवी तदा गुरु कवींद्र त्यातें वदे ॥
न हा द्विज बटू हरी कपटि वंचुनी बा तुला,
जगत्रय हि इच्छितो सकळ द्यावया शत्रुला ॥ ५८ ॥
नको म्हणत आसतां गुरु धरा तयाला दिली,
विरोचनसुतें तदा वचनसत्यता राखिली ॥
तदैव जगदीश्वरें निजविराटरूपच्छलें,
अनंत हि पदद्वयें जग समग्र ही व्यापिलें ॥ ५९ ॥
म्हणे तृतिय पाउला स्थळ कुठे वदें बा तदा,
करी शिर पुढें बळी हरि तयावरी दे पदा ॥
अमान्य गुरुवाक्य जो करि तयासि आधःस्थळीं,
करोनि हरिनें सुराधिपतिला त्रिलोकी दिली ॥ ६० ॥

## वृत्त स्रग्धरा.

गेला जो ऊर्ध्वपाद त्रिभुवनगुरुचा तन्नखें रंध्र झालें,
ब्रह्मांडाच्छादनाला तदुपरि जळ जें शुद्ध तें आंत आलें ॥

पादस्पर्शें प्रभूच्या सकलजगदघध्वंसकर्तृत्व त्यातें,
ये स्वर्गी ब्रह्मदेवाद्यमरनुत पडे घोर तीर्थौघ पातें ॥ ६१ ॥

**आर्या.**

विष्णुपदस्पर्शानें, विष्णुपदीनांव पावली राया ॥
तेथुनि स्वर्गीं राहे, गंगानामें सुरांसि ताराया ॥ ६२ ॥
देवमुनि स्तविति जिला, गाती गंधर्व सर्वदा राया ॥
सुरसिंधू ती भूवरि, आली कलुषौघ सर्व ताराया ॥ ६

**वृत्त मालिनी.**

सगरतनय रामा मत्त होवोनि गेले । कपिलनयनवन्हीमाजि पोळोनि
शुभगति पितरांतें द्यावया दीनबंधु । भगिरथ नृप आणी भूवरी स्वर्गं

**आर्या.**

कवणे वंशीं सांगा, राम म्हणे जन्मला सगर त्यास
पुत्र किती कां झाला सकळांसि ब्रह्मदंड दात्यांसी ६५ ॥

**दिंडी.**

सूर्यवंशीं नृप सगरराज रामा । होय विख्याती शूर पुण्यधामा ॥
ज्या नामें केशिनी सुमती या । सुशीला त्या आसती दोन जाया ॥६६॥

**साकी.**

एक पुत्र त्या केशिनिलागीं, असमंजस हा झाला ॥
साठ हजार हि पुत्र आसती, शूर तसे सुमतीला ॥ ६७ ॥
अश्वमेधमख राय करी ते, नवनवती ही झाले ॥
पूर्ण कराया शतसंख्येला, अंत्य यज्ञ तो चाले ॥ ६८ ॥
दीक्षित होउनि सगर बैसला, प्रदक्षिणेला चाले ॥
श्यामकर्ण त्या रक्षायास्तव, सुमतीपुत्र निघाले ॥ ६९ ॥
राजबिरुदयुत अश्वमस्तकीं, पत्र असे त्यामाजी ॥
लिहिलें त्याणें अश्व धरावा, जो समराला राजी ॥ ७० ॥

**वृत्त स्रग्धरा.**

नव्याणौ यज्ञ झाले शतमख मख तो शंभरावा विलोकी ।
साहीना कर्म त्याचें शतमख म्हणुनी नांव होईल लोकीं ॥
न व्हावा यज्ञ पूर्ण स्वपदयश सदा राहवे याचि भावें ।
केलें जिह्म स्वयोगें क्रतुहय हरुनी गुप्त होवोनि धांवे ॥ ७१ ॥

**वृत्त यूथिका.**

गुप्त होय मघवा हय घेउनी । ठेवि त्यासि कपिलाश्रमिं नेउनी ॥

विस्मय जाहला । नाकळे तुरग कोणि हिरावला ॥ ७२ ॥

**वृत्त स्वकृत.**

ते चहूंकडे ... हय त्यांसि परि कुठे न सांपडे ॥
मग चा ... रिती साठ हजार विचार ही ॥ ७३ ॥

**...तिलका.**

... लागति अवनीतें ॥
... म्हणती तयाला ॥७४॥
... प्रतिकूल नेलें ॥
... ते विस्मयाला ॥७५॥

... ऐसा नरांसी ॥
... राया न ... ते ... ॥ ७६ ॥
... पहा नेत्र झांकोनियां बसलासे ॥
... जळोनी च तन्नेत्रवन्हींत जाती ॥ ७७ ॥

**...ति.**

थोरांसि ... वधें चि ते भोगिति ताप वांयां ॥
पहा नृपेंद्रात्मभवा ... अधोगती कर्मदशा फळाली ॥ ७८ ॥
शापाग्निमाजी सुतसंघ पवे । चिंता करी राय कसें करावें ॥
ज्येष्ठस्त्रियेचा सुत एक होता । न आवडे त्यास प्रपंचगोता ॥ ७९ ॥
योगी बळें कुत्सितभाव दावी । मुलें जनांचीं जळिं बूडवावीं ॥
कृती अशी ती असमंजसाची । बरी न वाटे सगरासि साची ॥ ८० ॥
जाणोनि तातें सुत दूर केला । मुलांसि देवोनि निघोनि गेला ॥
सांगेन त्याच्या सुतविक्रमासी । असे बळी तो गुणरत्नराशी ॥ ८१ ॥

**आर्या.**

हा पुत्र अंशुमान, प्रभुसि म्हणे श्यामकर्ण आणीन ।
जाणीन तातगतिला, शत्रूचा सर्व गर्व खाणीन ॥ ८२ ॥
ऐसें वदोनि गेला, कपिलाश्रमिं पाहुनी वदे वाजी ।
वंदुनि मुनिचरणाला, मज दीनालागिं पाव देवाजी ॥ ८३ ॥

**वृत्त वसंततिलका.**

गेले जळोनि पहतां निजपूर्वजाला । तेथें चि देव असमंजसपुत्र प्याला ॥
वृत्तांत सर्व मुनिच्या वदनें तयांचा । ऐकोनि नम्र वदला मग दीन वाचा ॥८४॥

**आर्या.**

झाला स्वकर्मयोगें, मुनिराया ब्रह्मदंड पितरां या ।

अनुक्रमणिका

दु:परिहार परंतू, सुलभ उपायासि सांग चि तर

**वृत्त उपजाति.**

पाहोनि त्याच्या विनयासि रामा । प्रसन्न झाला कपिरं
ठेवोनियां मस्तकिं हस्त त्याच्या । युक्ती वदत
गंगाजळावांचुनि यांसि पाहीं । गं दंइ तश
गंगाव दे पापिज

तुझे
सुकर्म
प्रयत्न
पिताम हि करी तुझा
तथ स्तु म्हणुनी निघे मुने
करोनि हय घेउनी निजपुरं
पितामह हि नातवा स
म्हणे पदिं नतासि भला ॥ ८९ ॥
समाप्त करुनी क्रतू देउनी ।
रिघे सगर काननीं जितसपत्न झाला मुनी ॥
पितामहसमान तो सगरनातु रक्षी प्रजा ।
तया सकळ वानिती नृपति नाहिं ऐसा दुजा ॥ ९० ॥

**साकी.**

राज्य करी नृप अंशुमान परि, पितरां मुक्ती व्हावी ॥
वसे हेतु तध्दृदयीं यास्तव, तें चि कर्म हा दावी ॥ ९१ ॥
राज्यभार मग सकळ निजात्मज, दिलीपमस्तकिं ठेवी ॥
वनीं निघाला तपासि व्हाया, प्रसन्न गंगादेवी ॥ ९२ ॥
बहु वर्षें करि वनीं तपा परि, प्रसन्न नाहीं झाली ॥
घडेल कोठुनी लिहिलें नाहीं, विधिनें जे निजभाळीं ॥ ९३ ॥
वितथयत्न तो जाय लयाला, ऐके दिलीप मानी ॥
स्वयें इच्छि निजपितरां द्याया, सुतनय गंगापाणी ॥ ९४ ॥
राज्य निजात्मज भगीरथातें, देउनि काननिं आला ॥
तो हि पित्यापरि व्यर्थमनोरथ, जाय दिलीप लयाला ॥ ९५ ॥

**वृत्त उपजाति.**

भगीरथें आइकिलें स्वकानीं । केलें महत्पाप मदें स्वकांनीं ॥

पदास गेला । जाण्नि पुत्रें मग य केला ॥ ९६ ॥
सि निजात्मजातें । निध मुनी वा त्याते ॥
पितरांसि द्याया । सुपुत्र ये कानानि ॥ ९७ ॥
त अमर्त्य येती । गंधर्व विद्याधर सिद्ध गातें ॥
मानवाला । हिमाचळीं त्या राळ आला ॥ ९८ ॥
र वाहताती । हिमें दिसे चित्रविचित्र ाती ॥
देव येती । जेथे सदा अद्भुत सौख्य घेती ॥ ९९ ॥
द्रुप दृष्टी । पडे किती वानर गृष्टी ॥
र तया ठिकाणीं । भीतिप्रदीं जाय सुपुण्यराणी ॥१००॥
पवित्र झाडी । स्वर्गमलासि झा ॥
रवें वनें तीं । बोलावुनी देवगतीस ॥ १०१ ॥
सुख देव यांतें । न होय तें नंदनि दवातें ॥
महिमा तयाची । गिरि जयाची ॥१०२॥
ती सरें तीं । सभोंवती रेती ॥
ठोदकानें परिपूर्ण कांठीं । क्रीडा वया देवविमानदाटी ॥ १०३ ॥

**वृत्त स्वागता.**

भूप एक पांहि, स्वादु ज्यांत जळ निर्मळ वाहे ॥
दीसताति कमळें फुललेलीं, आंत देव करिती जलकेली ॥ १०४ ॥

**वृत्त कामदा.**

पंकजें जयामाजि फूललीं, मत्त फीरती भोंवतीं अली ॥
पद्मगंध त्या पर्वतीं तसा, सौख्य देतसे प्राणिमानसा ॥ १०५ ॥
हंस बैसले पंकजांवरी, मत्स्य खेळती जीवनांतरीं ॥
निर्मळोदकीं कांसवें तळीं, पाणकोंबडीं हिंडती जळीं ॥ १०६ ॥

**वृत्त वसंततिलका.**

कारंडवीं बदकसारसचक्रवाकीं । केलें प्रपूर्ण निनदें ध्वनि जाय नाकीं ॥
देवांगनारचित संतत केलियोगें । वक्षोजपंकगत गंध जळासि लागे ॥ १०७ ॥
गंधासि लुब्ध मृग पक्षि सदैव नाना । तद्वारिच्या करिति पीयुषतुल्य पाना ॥
दंती परस्पर करें जळ टाकिताती । खेळावयासि करिणींसह आंत जाती ॥१०८॥

**वृत्त मालिनी.**

मधुर रव पिकांचा कानीं ये एक ठायीं ।
शुक सह मृदु शब्दें बोलती सारिका ही ॥
जलचरबकहंसध्वान ऐकावयासी ।

अनुक्रमणिका

